**कोषागारातून रोख देय अनुदान**

**अर्थसंकल्पीय अनुदान २०११-१२**
महाजल कार्यक्रमांतर्गत ग्रामीण पाणी पुरवठा योजनांच्या देखभाल दुरुस्तीसाठी अनुदाने.
**लेखाशिर्ष (२२१५ २०८२)**

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग,**
शासन निर्णय क्र. देप्रोअ-०५११ / प्र.क्र. ६२/ पापु-०८,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२ दिनांक १४ फेब्रुवारी, २०१२

संदर्भ : - १) शासन निर्णय क्र. देप्रोअ-०५११/प्र.क्र.६२/ पापु-०८, दिनांक १७ जून, २०११
२) शासन निर्णय क्र. देप्रोअ-०५११/प्र.क्र.६२/ पापु-०८, दिनांक २८ सप्टेंबर, २०११
३) शासन निर्णय क्र. देप्रोअ-०५११/प्र.क्र.६२/ पापु-०८, दिनांक १७ नोव्हेंबर, २०११
४) शासन निर्णय क्र. देप्रोअ-०५११/प्र.क्र.६२/ पापु-०८, दिनांक १६ डिसेंबर, २०११

**प्रस्तावना :-**

ग्रामीण पाणी पुरवठा योजनांच्या देखभाल दुरुस्तीसाठी उपलेखाशिर्ष २२१५ २०८२ खाली आर्थिक वर्ष २००११-१२ मध्ये रु. २४००.०० लक्ष इतकी तरतूद मंजूर आहे. या तरतूदीपैकी उपरोक्त संदर्भाधीन शासन निर्णयान्वये एकूण रू. १२,००,००,०००/- इतका निधी जिल्हा परिषदा/महाराष्ट्र जीवन प्राधिकरणास वितरीत करण्यात आला आहे.

कॅश-फ्लो प्रमाणे माहे फेब्रुवारी, २०१२ करिता संगणक वितरण प्रणालीवर उपलब्ध असलेल्या निधीतून सदर महिन्यात रु. ३,४१,७४,०००/- एवढा निधी संगणक वितरण प्रणालीद्वारे जिल्हा परिषदांना वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

प्रस्तावनेत नमूद केल्यानुसार, आर्थिक वर्ष २०११-१२ मध्ये ग्रामीण नळ पाणी पुरवठा योजनांच्या देखभाल दुरुस्तीसाठी (ग्रामपंचायतींनी मागील आर्थिक वर्षात केलेल्या भरीव कामासाठी बक्षीस रूपाने देण्याकरीता) उपलेखाशिर्ष २२१५ २०८२ खाली उपलब्ध रु. **३,४१,७४,०००/- (रूपये तीन कोटी एकेचाळीस लाख चौ-याहत्तर हजार फक्त)** तरतूद शासन, सोबत जोडलेल्या विवरण पत्रातील स्तंभ क्र. ३ नुसार संबंधित जिल्हा परिषदेचे मुख्य कार्यकारी अधिकारी यांना माहे फेब्रुवारी, २०१२ मधील कॅश-फ्लो नुसार पुढील अटींवर रोख मंजूर व मुक्त करीत आहे.

अ) जिल्हा परिषदांनी हे अनुदान सन- २०११-१२ या आर्थिक वर्षात केवळ ग्रामीण भागातील नळ पाणी पुरवठा योजनांच्या देखभाल दुरुस्तीसाठी शासनाने वेळोवेळी दिलेल्या सूचनांनुसार खर्च करावयाचे आहे.

ब) जिल्हा परिषदांनी या अनुदानातून केलेल्या खर्चाचे स्वतंत्र लेखे ठेवावेत.

क) वरील अटी/शर्तीची जिल्हा परिषदांकडून पूर्तता होत आहे ह्याची शासनाला खात्री करुन घेता यावी म्हणून महालेखापाल, महाराष्ट्र- १/२, मुंबई / नागपूर यांना तसेच या विभागातील प्राधिकृत केलेल्या अधिका-यास लेखा परिक्षणाकरीता जिल्हा परिषदांची पुस्तके व लेखे पाहण्याचा अधिकार राहील, महालेखापाल यांना त्यांचे काम योग्य त-हेने पार पाडता यावे म्हणून जिल्हा परिषदा संपूर्ण मदत व सुविधा पुरवतील.

ड) शासन परिपत्रक ग्राम विकास विभाग क्र. आरसीएन-१०८९/सीआर-३०२७/२८, दि.५.९.१९९० मधील सूचनेप्रमाणे या अनुदांनाच्या खर्चाचा महालेखापाल कार्यालयात नोंदविलेल्या खर्चाशी ताळमेळ घालावा व ताळमेळाचे अहवाल विहीत दिनांकाना जिल्हा परिषदांनी विभागीय आयुक्त ( विकास शाखा ) यांना व या विभागातील कार्यासन क्र. पापु-०५, पापु-०८ व पापु- २० ला सादर करावे.

२. यासाठी होणारा खर्च मागणी क्र. वाय- २, "२२१५, पाणी पुरवठा व स्वच्छता-१०२- ग्रामीण पाणी पुरवठा कार्यक्रम (०२) जिल्हा परिषदांना योजनांतर्गत अनुदाने (०२) (१६) नळाद्वारे पाणी पुरवठा योजना- परिरक्षण व दुरुस्ती यासाठी अनुदान (२२१५ २०८२) ३१, सहायक अनुदान (वेतनेतर)" या लेखाशिर्षाखाली सन २०११-१२ या वर्षीच्या उपलब्ध तरतूदीतून खर्ची घालावा.

३. सदर निधी तात्काळ आहरीत करुन घ्यावा.

४. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या मान्यतेने त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्र. ५६/१२, व्यय-०३, दि. ६.२.२०१२ नुसार निर्गमीत करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करुन देण्यात आला असून यांच्या संगणक संकेतांक २०१२०२०२०९३८५२२५२००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

सही/-

**( ल. गो. ढोके )**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रति,

१) विभागीय आयुक्त, सर्व

२) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, रत्नागिरी, धुळे, जळगाव, पुणे, सातारा, कोल्हापूर, जालना, बीड, लातूर, अकोला, वाशिम, वर्धा, गोंदिया व गडचिरोली.

३) मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद, रत्नागिरी, धुळे, जळगाव, पुणे, सातारा, कोल्हापूर, जालना, बीड, लातूर, अकोला, वाशिम, वर्धा, गोंदिया व गडचिरोली.

४) कार्यकारी अभियंता (ग्रामीण पाणी पुरवठा विभाग), जिल्हा परिषद, रत्नागिरी, धुळे, जळगाव, पुणे, सातारा, कोल्हापूर, जालना, बीड, लातूर, अकोला, वाशिम, वर्धा, गोंदिया व गडचिरोली.

५) सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई

६) मुख्य अभियंता, भारत निर्माण कक्ष, सिडको भवन, बेलापूर, नवी मुंबई

७) जिल्हा कोषागरे अधिकारी, रत्नागिरी, धुळे, जळगाव, पुणे, सातारा, कोल्हापूर, जालना, बीड, लातूर, अकोला, वाशिम, वर्धा, गोंदिया व गडचिरोली.

८) महालेखापाल, महाराष्ट्र-१/२ ,मुंबई / नागपूर (लेखा परिक्षा / लेखा व अनुज्ञेयता)

९) मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, मुंबई.

१०) मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा , नाशिक, पुणे, अमरावती, औरंगाबाद व नागपूर

११) अधीक्षक अभियंता, विभागीय भारत निर्माण कक्ष (सर्व)

१२) नियोजन विभाग/वित्त विभाग (व्यय-३), मंत्रालय, मुंबई

१३) पाणी पुरवठा व स्वच्छता विभागातील कार्यासने क्र. पापु-०४, पापु-५ व पापु-२०

१४) निवडनस्ती, पापु-०८

# विवरणपत्र

शासन निर्णय क्र. देप्रोअ-०५११/प्र.क्र.६२/पापु-०८, दिनांक १४ फेब्रुवारी, २०१२ चे सहपत्र
लेखाशीर्ष २२१५ २०८२ खाली ग्रामीण पाणी पुरवठा योजनांच्या देखभाल दुरुस्तीसाठी (ग्रामपंचायतींनी मागील आर्थिक वर्षात केलेल्या भरीव कामासाठी बक्षीस रूपाने देण्याकरीता) आर्थिक वर्ष २०११-१२ मध्ये वितरित करावयाचा निधी

**(रु.लाखात)**

| **अ.क्र.** | **जिल्हा परिषद** | **फेब्रुवारी , २०१२ मध्ये कॅशफ्लो वितरीत करावयाचा निधी** |
|---|---|---|
| १ | २ | ३ |
| १ | रत्नागिरी | २४.४१ |
| २ | धुळे | २४.४१ |
| ३ | जळगाव | २४.४१ |
| ४ | पुणे | २४.४१ |
| ५ | सातारा | २४.४१ |
| ६ | कोल्हापूर | २४.४१ |
| ७ | जालना | २४.४१ |
| ८ | बीड | २४.४१ |
| ९ | लातूर | २४.४१ |
| १० | अकोला | २४.४१ |
| ११ | वाशिम | २४.४१ |
| १२ | वर्धा | २४.४१ |
| १३ | गोंदिया | २४.४१ |
| १४ | गडचिरोली | २४.४१ |
| | **एकूण :-** | **३४१.७४** |

**(एकूण रूपये तीन कोटी एकेचाळीस लाख चौ-याहत्तर हजार फक्त)**

सही/-
(ल. गो. ढोके)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन